अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वननिवासी (वनहक्क मान्यता) अधिनियम २००६ नियम २००८ व सुधारित नियम २०१२ नुसार

# वन कार्ययोजना आराखडा

सामूहिक वनहक्काचे संरक्षण व व्यवस्थापन योजना

## ग्रामसभा- जांगदा बु.

कालावधी

(सन 2022-23 ते 2031-32)



वन परिक्षेत्र - धानोरा (उत्तर)

तालुका - धानोरा

जिल्हा - गडचिरोली

| क्रमांक | अनुक्रमाणिका | पृष्ठ क्रमांक |
|---|---|---|
| 1. | आमच्या गावा विषयी | 6 |
| 1.1 | प्रस्तावना | 6 |
| 1.2 | पार्श्वभूमी | 7 |
| 1.3 | इतिहास | 11 |
| 1.4 | गावाची प्राथमिक माहिती | 12 |
| 1.5 | गावाची भौगोलिक माहिती | 13 |
| 1.6 | गावाची व्यावसाया संबंधी माहिती | 13 |
| 1.7 | पोलो - निसर्गाशी संबंधित सन | 14 |
| 1.8 | संघटन | 3 |
| 1.9 | इतर ग्रामसभा व महासंघाशी संबंध | 4 |
| 1.10 | गावात असलेल्या सुविधा | 4 |
| 1.11 | पशुधन माहिती | 4 |
| 1.12 | कृषीपिके हंगाम माहिती | 5 |
| 1.13 | पावसाची सरासरी | 5 |
| 2 | वनव्यवस्थापन आराखड्याविषयी | 6 |
| 2.1 | उद्देश व कृती | 6 |
| 2.2 | सामुहिक वनसंपत्ती क्षेत्राचा तपशील | 7 |
| 2.3 | सीमा व हद्दीची स्थिती | 9 |
| 2.4 | समुदायीक वन हक्क प्राप्त जंगलावरील सद्यस्थितीतील अडचणी व धोके | 9 |
| 2.5 | जमिनीचा वापर तक्ता | 10 |
| 2.6 | भूभाग/जलभाग यादी | 10 |

| | | |
|---|---|---|
| 2.7 | ग्रामसभेद्वारा सीमांकन केलेला नकाशा | 11 |
| 2.8 | वनक्षेत्रातील टापू (पारंपारिक ) संबधी माहिती | 12 |
| 2.9 | वृक्षांचा विविध भूभागावर संख्यात्मक अंदाज | 13 |
| **3** | **वनहक्क अंतगर्त मिळणाऱ्या लाभांची गरज आणि वापर तपशील** | 20 |
| 3.1 | पत्रक 1 अन्न | 20 |
| 3.2 | पत्रक 2 चारा | 23 |
| 3.3 | पत्रक 3 जाळाऊ लाकूड | 25 |
| 3.4 | पत्रक 4 घर बांधणी | 26 |
| 3. 5 | पत्रक 5 कृषि अवजारे | 27 |
| 3.6 | पत्रक 6 कुंपण घालणे | 28 |
| 3.7 | पत्रक 7 संस्कृती | 29 |
| 3.8 | पत्रक 8 वन औषधी | 30 |
| 3.9 | पत्रक 9 इतर | 35 |
| 3.10 | समुदायाने विक्रीसाठी जमा केलेल्या वनउपजचे विश्लेषण | 36 |
| **4** | **ग्रामसभा सक्षमीकरण** | 37 |
| 4.1 | हक्क | 37 |
| 4.2 | नियम | 37 |
| **5** | **शासकीय योजना** | 41 |
| 5.1 | वन आधारित योजना | 41 |
| 5.2 | आदिवाशी विभाग योजना | 41 |
| 5.3 | कृषी आधारित योजना | 41 |
| 5.4 | पशूसंवर्धन योजना | 41 |
| 5.5 | रोहयो | 41 |

| | | |
|---|---|---|
| 5.6 | सिंचन विभाग | 41 |
| 5.7 | मत्स्य विभाग | 41 |
| **6** | **गौणवनउपज आधारित आजीविका कार्यक्रम** | 56 |
| **7** | **परिशिष्ट** | 57 |
| 7.1 | वनक्षेत्राचा नकाशा (टोपोशीट) | 57 |
| 7.2 | सिमांकित सामुहिक वनहक्क क्षेत्राचा नकाशा (GPS) | 58 |
| 7.3 | नजरी नकाशा | 59 |
| 7.4 | वनस्पती उपलब्धता (गोंडी - मराठी - इंग्रजी) | 63 |
| 7.5 | दुर्मिळ वनस्पतींची यादी | 90 |
| 7.6 | प्राण्यांची/वन्यजीव माहिती | 93 |
| 7.7 | खनिज | 103 |
| 7.8 | बांबू चक्र | 104 |
| 7.9 | हंगामानुसार करावयाच्या कामाचे वेळापत्रक | 107 |
| **8** | **वर्षनिहाय कार्य योजना** | **109** |
| 8.1 | वर्ष - मार्च 2022 - एप्रिल 2023 (1) | 110 |
| 8.2 | वर्ष - मार्च 2023 - एप्रिल 2024 (2) | 111 |
| 8.3 | वर्ष - मार्च 2024 - एप्रिल 2025 (3) | 114 |
| 8.4 | वर्ष - मार्च 2025 - एप्रिल 2026 (4) | 117 |
| 8.5 | वर्ष - मार्च 2026 - एप्रिल 2027 (5) | 121 |
| 8.6 | वर्ष - मार्च 2027 - एप्रिल 2028 (6) | 125 |
| 8.7 | वर्ष - मार्च 2028 - एप्रिल 2029 (7) | 129 |
| 8.8 | वर्ष - मार्च 2029 - एप्रिल 2030 (8) | 133 |
| 8.9 | वर्ष - मार्च 2030 - एप्रिल 2031 (9) | 136 |
| 8.10 | वर्ष - मार्च 2031 - एप्रिल 2032 (10) | 140 |
| | **मार्गदर्शक/सहभागी व्यक्ती व छायाचित्रे** | 143 |

# ठराव



**ग्रामसभेचे नाव:** जांगदा बु.
**ग्राम पंचायतीचे नाव:** जांगदा बु.
**तालुक्याचे नाव:** धानोरा
**जिल्हा:** गडचिरोली
**दिनांक:** 09/12/2022

**ठराव:**

**क.)** असे घोषित करण्यात येते की , यासोबत जोडलेल्या व्यवस्थापन आराखड्यावर चर्चा झाली आहे आणि सदर व्यवस्थापन आराखडा आजपासून. 10 वर्षे या कालावधीसाठी स्वीकारण्यात आला आहे.

**ख. )** असेही घोषित करण्यात येते की , सोबतचा आराखडा वन विभागाच्या आराखडा / सूक्ष्म आराखडा / चालू आराखडा ( Management Plan / Micro Plan / Working Plan) यांच्याशी खालीलप्रमाणे सुसंगत राहिल

**i)** सोबतचा व्यवस्थापन आराखडा यापुढे वन विभागाच्या वनव्यवस्थापन आराखडा / सूक्ष्म आराखडा / चालू आराखडा यामध्ये अंतर्भूत असेल.

**ii)** वन विभागाच्या व्यवस्थापन आराखडा / चालू आराखडा / सूक्ष्म आराखडा यातील या सामूहिक वन संसाधन व्यवस्थापन आराखड्याशी सुसंगत नसलेला भाग यापुढे वगळण्यात आला आहे असे समजण्यात येईल. वन विभागाने विनाविलंब याबाबत खात्री करावी.

**ग.)** सामूहिक वनहक्क व्यवस्थापन समिती यांना या आराखड्याची प्रत स्थानिक जिल्हा वन संरक्षक यांना पाठविण्याबाबत सूचित करण्यात येत आहे.

**घ.)** याद्वारे असेही घोषित करण्यात येते की , ही ग्रामसभा जेंव्हा गरज भासेल तेंव्हा हा व्यवस्थापन आराखडा सुधारीत करणे, तसेच वन विभागाच्या सुक्ष्म / चालू आराखड्यातील भाग सुधारीत करणे याबाबतचा हक्क राखून ठेवत आहे.

**च.)** यानंतर असेही घोषित करण्यात येते की , कोणीही या सामूहिक वनहक्क क्षेत्रामध्ये व्यवस्थापन , वृक्षारोपण, वृक्षतोड आणि वनांचे पुनरुज्जीवन यासारखे उपक्रम या ग्रामसभेच्या पूर्व सूचित परवानगीशिवाय घेणार नाही.

## 1. आमच्या गावाविषयी

### 1.1. प्रस्तावना

इंग्रजांच्या वसाहत काळात तसेच स्वातंत्र्यानंतर वनांच्या एकत्रीकरणात आदिवासी व वनात पिढ्यानपिढ्या वास्तव्य करणाऱ्या जन समुहावर झालेला ऐतिहासिक अन्याय दूर करण्यासाठी करण्यात आलेला भारत सरकारचा कायदा "अनुसुचित जमाती व इतर पंरपंरागत वननिवासी ( वन हक्क मान्य करणे) अधिनीयम 2006 नियम 2008 व सुधारित नियम 2012" नुसार कलम 3(1) नूसार सामुहिक वन हक्क मिळण्याचे अधिकार प्राप्त झाले. यामध्ये अनुसूचित जमाती किंवा इतर पारंपारिक वननिवासी यांना सामुहिक वन हक्कांतर्गत निस्तार सारखे हक्क, गावाचे सिमेंतर्गत किंवा सिमेबाहेर पारंपारिकरित्या गोळा केले जाणारे वन उत्पादन , त्याचा वापर करणे किंवा त्याची विल्हेवाट लावणे यासाठी स्वामित्व हक्क , पाण्यामधील मत्स्य व अन्य उत्पादने , चराई करणे, पारंपारिक मोसमी साधनसंपत्ती मिळविणेइत्यादी हक्क आहेत.

अनुसुचित जमाती व इतर पारंपारिक वननिवासी (वन हक्काची मान्यता) अधिनियम 2006 अस्तित्वात आल्यानंतर अनुसुचित जमाती व अन्य पारंपारिक वननिवासी (वन हक्काची मान्यता)नियम 2008 व सुधारित नियम 2012 तयार करण्यात आले.सुधारित नियम 2012 चे नियम 4(1)(च) नुसार अनुसुचित जमाती व इतर पारंपारिक वननिवासीं यांच्या फायद्यासाठी अश्या सामुहिक वन संसाधनाचे शाश्वत व समसमान व्यवस्थापन करण्यासाठी सामुहिक वन संपत्तीचे संवर्धन करण्याची व तीचे व्यवस्थापन करण्याची योजना तयार करणाऱ्या वन विभागाच्या सूक्ष्मदर्शक आराखडा किंवा कार्यआयोजना किंवा व्यवस्थापन योजनाबरोबर संवर्धन व व्यवस्थापन योजना समितीला करणे आवश्यक वाटेल अश्या फेरबदलाविषयी एकत्रीकरण करणाऱ्या खंड (ङ) नुसार गठीत करण्यात

आलेल्या समितीचे संनियंत्रक व नियंत्रण करणे अशी जबाबदारी ग्रामसभाना देण्यात आली. कायद्यातील नियम 4(1)(च) च्या तरतूदीनुसार कर्तव्ये पार पाडण्यासाठी ग्रामसभा तिच्या सदस्यामधून नियम 4(1)(ङ) नुसार स्थापन केलेल्या समितीला "सामुहिक वन हक्क व्यवस्थापन समिती " (Community Forest Rights Management Committee)असे संबोधण्यात यावे. सदर समितीचे संनियंत्रन व नियंत्रन ग्रामसभा करेल. ग्रामसभेतील सामूहिक वन संपत्तीचे संवर्धन व व्यवस्थापन योजना तयार करणे , नैसर्गिक साधन संपत्तीच्या व्यवस्थापनातून प्राप्त होणारा महसुल तसेच शासनाकडुन प्राप्त होणारा निधी यांचे बँक खात्यामार्फत संनियंत्रण करणे , जमाखर्चाचे लेखे व लेखापरिक्षण ठेवणे इत्यादी प्रशाकीय बाबी पार पाडण्याकरीता सदर समिती ही वनहक्क कायद्याच्या अंमलबजावणीसाठी ग्रामसभेची कार्यकारी समिती असेल.त्यामुळे सामुहिक वन हक्कांतर्गत प्राप्त क्षेत्राचा आराखडा तयार करणेची जबाबदारी ग्रामसभा व ग्रामसभाद्वारे नियुक्त सामुहिक वन हक्क व्यवस्थापन समितीस या कायद्याने देण्यात आली आहे.त्यानुसार आराखडा तयार करण्यात आला आहे.

## 1.2 पार्श्वभूमी

जांगदा बु. ग्रामसभेला 6 मे 2013 रोजी मिळालेल्या सामूहिक वनहक्कांचे हक्क जोडपत्र तीन नुसार 456.54 हेक्टर आराजी क्षेत्र मिळालेले आहे. पूर्ण सीमांकन करून गावचे क्षेत्र एकूण 920 हे. आहे. गावाला वनहक्क प्राप्त झाल्यामुळे आता सर्व जल,जंगल,जमीन ही गावकर्यांचीच झाली परंतु याच अर्थ असा नाही की आता आपण पूर्ण जंगल सम्पवून टाकायचं , तर या जंगलाला पुन्हा वेगवेगळ्या जैवविविधतेने सजवायची जिमेदारी सुद्धा सरकारने आपल्याला दिली आहे. आतापर्यंत जंगल आपले ¬ नाही अशी समज धरून आपल्याला जंगलातील काही वस्तू आणायची असल्यास ते खोडासकट किंवा मुळासकट आणायचे परंतु आता मात्र हे जंगल आपलेच धन आहे तर त्याला कोणत्या पद्धतीने जपायचे त्याची कशी रक्षा करायची याचा सर्व मिळून विचार विनिमय करून योग्य निर्णय घेणे आवश्यक आहे. त्यासाठी करायची उपाययोजना म्हणजे आपल्या जंगलाची कार्ययोजना. तर

ती कशी राहील आतापर्यंत फॉरेस्ट डिपार्टमेंट कशा पदडतीने जंगलाच सौरक्षण करत असे ते आम्हाला माहीत आहे. ते सुद्धा आपल्या कार्ययोजना प्रमाणे काम करीत असे. मग आपण ही तशीच करायची का ? की वेगळी करायची. तर फॉरेस्ट डिपार्टमेंट च्या कार्ययोजना मध्ये फक्त टिम्बर म्हणजेच इमारती लाकूड यालाच सर्वात जास्त महत्व असे. मग आपल्याला ही विचार करायला पाहिजे की आमच्या गावासाठी आणि लोकांसाठी काय काय आवश्यक आहे , आपल्या घरापूर्ती इमारती लाकूड,इंधनासाठी जळाऊ लाकूड,खाण्यासाठी वासते, आपली थोडीफार पैशाची गरज भागविण्यासाठी गौणवनोपज (चार ,आवळा,डिंक इ.), आपल्या गुरांसाठी चारा ,आणि फार महत्वाचा म्हणजे आपले लाखो रुपये वाचवून आपला करोडो रुपयाचा जीव वाचवणार्या औषधी वनस्पती.

एवढ्या साऱ्या गोष्टी आपल्याला वनहक्का अंतर्गत मिळाल्या आहेत मग याचा फायदा फक्त आपणच घेऊन सोडायच का ? नाही, तर ते पिढ्यानपिढ्या टिकले पाहिजे आणि आपल्या समोरच्या सर्व पिढी पर्यंत पोहचलीच पाहिजे यासाठी आपल्याला या सर्व गोष्टींचा विचार करून , आपली गरज , गुरांची गरज , जंगलातील प्राण्यांची गरज या सर्वांची गरज भागवून पुन्हा वाचेल आणि पुन्हा टिकून राहील अशापद्धतीची कार्ययोजना तयार करायची आहे.

आमच्या जांगदा बु. (खैरी टोला, मडावी टोला, इतुम टोला) सर्वांच्या सहकार्याने आम्ही ही कार्ययोजना तयार करू आणि त्यानुसार आमच्या सामूहिक वनहक्कांचा पुरेपूर फायदा घेऊन आम्ही "आमच्या जंगलाची रक्षा करू , नि आमचे पोट भरू " आणि एकदिवस असे म्हणू की,

**"आम्ही जंगलाचे राजे,**
**सन्मानाने जगतो।**
**आणि अमुचा विकास करतो,**
**जंगल राखून जंगल राखून"।।**



**आराखडा तयार करणे संबंधी चर्चा करतांना ग्रामसभा**

# सामुहिक वन हक्कांचे हक्क जोडपत्र - 3

भारत सरकार
जमाती कार्य मंत्रालय
अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वन निवासी (वन हक्क मान्य करणे)नियम, २००८
सामुहिक वनहक्कांचे हक्क
जोडपत्र - तीन (सुधारीत)

मौजा - जांगदा बु.
जि.प्र.क्र. -६६१/२०११

| | | |
|---|---|---|
| १ | सामुहिक वनहक्क धारकाचे नांव/धारकांची नांव | ग्रामसभा जांगदा बु. |
| २ | गांव / ग्रामसभा | जांगदा बु. |
| ३ | ग्रामपंचायत | जांगदा बु. |
| ४ | तहसिल / तालुका | धानोरा |
| ५ | जिल्हा | गडचिरोली |
| ६ | अनुसूचित जमाती आहे की / इतर पांरपारिक वन निवासी आहे | अनुसूचित जमाती किंवा इतर पारंपारीक वननिवासी किंवा दोन्ही |
| ७ | सामुहिक हक्कांचे स्वरुप<br>वन जमिनीच्या सामुहिक हक्कांसाठी दाव्यात नमुद केलेले हक्क खालील प्रमाणे | |
| | १. निस्तार या सारखे सामुहिक हक्क, काही असल्यास | निस्तार पत्रका प्रमाणे मान्य |
| | २. गौण वनोत्पादनावरील हक्क, काही असल्यास | अधिनियमाचे कलम ३(१) (ग) प्रमाणे मान्य |
| | ३. अन्य सामुहिक हक्क | |
| | क) वापर किवा हक्कदारी असलेले (मासे,जलनिकाय), काही असल्यास, | अधिनियमाचे कलम ३(१) (घ) प्रमाणे मान्य |
| | ख) चराई, काही असल्यास, | अधिनियमाचे कलम ३(१) (घ) प्रमाणे मान्य |
| | ग) भटके व फिरते आदिवासी यांच्या करीता पांरपारिक साधनाची सुगमता, काही असल्यास, | लागु नाही |
| | ४. पीटीजी व कृषकपुर्व समूहांसाठी वस्तीस्थान व वस्तीयांची सामूहिक भूधारणा पध्दती, काही असल्यास, | लागु नाही |
| | ५. जैविक विविधता, बौध्दिक संपत्ती व पारंपारिक ज्ञान यांच्या हक्कांची सुगमता, काही असल्यास | जैविक विविधता अधिनियमांतर्गत स्थापन झालेल्या ग्रामस्तरीय जैवविविधता व्यवस्थापन समितीला अधिनियम अंतर्गत प्राप्त जैविक, बौध्दिक व पांरपारिक ज्ञानाचे हक्क |
| | ६. अन्य पांरपारिक हक्क, काही असल्यास | अधिनियमाचे कलम ३(१) (झ) प्रमाणे मान्य |
| ८ | शर्ती काही असल्यास | १) वरील सामुहिक हक्क उपजिविकेच्या वास्तवीक गरजांची परिपुर्ती करण्यासाठी ग्रामस्थांचा हक्क राहिल.<br>२) वरील सामुहिक हक्कांचा लाभ घेतांना कोणतेही नियमबाहय काम करता येणार नाही<br>३) गौण वनउपजांचे संकलन शास्त्रीय व शाश्वत पध्दतीने करण्यांत यावे.<br>४) सामुहिक वन हक्क प्रदान केलेल्या क्षेत्रात नविन बांधकाम करता येणार नाही.<br>५) वरील मंजूर केलेल्या प्रयोजनाखेरीज इतर कामाकरीता सदर क्षेत्राचा वापर करता येणार नाही.<br>६) वरील हक्काबाबत कोणत्याही स्वरुपात वाद झाल्यास जिल्हास्तरीय समितीचा निर्णय अंतिम राहील.<br>७) सामुहिक वनहक्क प्रदान केलेल्या क्षेत्रामध्ये कोणत्याही प्रकारची अवैध वृक्ष तोड करता येणार नाही.<br>८) सामुहिक वन हक्क प्रदान केलेल्या क्षेत्राकरीता " सुक्ष्मकार्यआयोजना," संबंधित ग्रामसभेनेच वनविभागाचे मदतीने तयार करून अंमलात आणावी. (जोपर्यंत असे होत नाही तोपर्यंत वनविभागाची विद्यमान कार्यआयोजना ग्रामसभेची मंजूरी घेऊन अंमलात आणावी)<br>९) शासनाकडून वेळोवेळी निर्गमित होणारे अधिनियम/नियम इत्यादी सर्वांना बंधनकारक राहतील.<br>१०) सामुहिक वन हक्क प्रदान करण्यात आलेल्या क्षेत्रात वनाचे संरक्षण व संवर्धन करणे आवश्यक राहिल. |
| ९ | रुढीप्राप्त सीमांसह / किंवा खसरा / खंड क्र यासह ठळक सीमाचिन्हे दर्शवून केलेले सीमांचे वर्णन (जर एकापेक्षा जास्त हक्क प्रदान करण्यात आले आहेत तर प्रत्येक प्रयोजनाचे तपशिल स्वतंत्र पणे नमुद करावे.) | आराजी :- ४५८.५४ हे. आर.<br>कं.नं. :- ५८८,५६८,५६९<br>स.नं. :- १६,१८,२४,६८,७६,९२,९३,१०३,१०४,१९८, १९९,२०३,२१९,२३३,१,४,७,११,१२,६१,५२,१९,२२,६२, ६४,७१,७४,९९,१०५,१२०,१२७,१२९,१६९,२३५,२३९, १७२,१९७,२०५,२२०,२०७,२१०,२१३,२१५,२१८,२२३, २२१,२२९,२४९,२५०,२५२,५७,२०९<br>चर्तु:सिमा :- पूर्व- ५७० , पश्चिम- ५६३ , दक्षिण- ५६०, उत्तर- ६०२ |

आम्ही खालील सही करणारे महाराष्ट्र शासन यांच्यासाठी व त्यांच्या वतीने , सामुहिक वनहक्कांच्या उपरोल्लेखीत धारकांना शीर्षकात उल्लेखिल्याप्रमाणे वनहक्क कायम करण्यासाठी आमच्या स्वाक्षऱ्या करीत आहोत.

सदस्य
उपवनसंरक्षक
जिल्हास्तरीय वनहक्क समिती
तथा उपवनसंरक्षक, गडचिरोली

जिल्हाधिकारी यांचे कार्यालय
गडचिरोली

सदस्य सचिव
जिल्हा स्तरीय वनहक्क समिती
तथा अप्पर जिल्हाधिकारी, गडचिरोली

6 MAY 2013

अध्यक्ष
जिल्हास्तरीय वनहक्क समिती
तथा जिल्हाधिकारी, गडचिरोली

Jod patra 2 samuhik dave2

2019/11/17



आराखडा व इतर विषयावर चर्चा

**आमची ग्रामसभा**

**ग्रामसभेचे नाव:-** जांगदा बु.

**ग्रामपंचायत:** जांगदा बु.

**तालुका:** धानोरा

**जिल्हा:** गडचिरोली

**सेन्सस कोड:** 538946

**अ.अक्षांश** : 20.343948N

**ब. रेखांश** : 80.278447E

**जोडपत्र दिनांक:** 06 मे 2013

**वनाधिकार अभिलेख (जोडपत्र )**

| हक्क | होय/नाही | शेरा |
|---|---|---|
| 1) निस्तार हक्क | होय | निस्तार पत्रका प्रमाणे मान्य |
| 2) गौण वनोत्पादनावरील हक्क | होय | अधिनियमाचे कलम 3 (1) (ग) प्रमाणे मान्य |
| 3) अन्य सामूहिक हक्क जसे- अ) वापर किंवा हक्कदारी असलेले (जल) ब) चराई ( जंगल) | होय | अधिनियमाचे कलम 3 (1) (घ) प्रमाणे मान्य |
| 4) जैविक विविधता, बौद्धिक संपत्ती व पारंपरिक ज्ञान यांच्या हक्कांची सुगमता. | होय | जैवविविधता कायद्यानुसार गठीत ग्रामस्तरीय समितीला हक्क |
| 5) अन्य पारंपरिक हक्क. | होय | अधिनियमाचे कलम 3 (1) (झ) प्रमाणे मान्य |

## 1.3 इतिहास

ग्रामसभा जांगदा बु

जांगदा बु हे गाव ब्रिटिश काळापासूनच अमलात आहे. त्या काळामध्ये जांगदा कला म्हणून ओळखला जायचा. परंतु काही समजदार लोकांनी एका परीक्षणामध्ये या गावाचे नाव जांगदा कला नसून जांगदा (बु) असे ठेवले. बु. म्हणजे बुजरूक (जुने) असलेले. असे म्हणतात की आमचा गाव म्हणजे आधीपासूनच असलेली (जुनी) वस्ती आहे म्हणून बुजरूक म्हणतात, तर काहींचे म्हणणे आहे की कोणताही न्याय करायचं झालं तर जवळपासच्या गावांमध्ये फक्त जांगदा गावातच बुजरूक व्यक्ती सापडायचे म्हणून याला बुजरूक म्हणतात. गावामध्ये आधीपासूनच आदिवासी लोक राहत आहेत. आदिवासी समुदायाची जीवन जगण्याची व्यवस्था पूर्णतः जंगलावर अवलंबून होती. त्यामुळे त्यांचे पोट काही वेळा भरत तर काही वेळा उपाशी राहत होते . जंगलात मिळणारी कोणतेही खाण्याजोगी वस्तू ते खायचे उदा. कंदमुळे, मोह, टेंभरून, चार, जांभूळ, प्रांण्याची शिकार करून त्यांचा मास, मासे, फळे अशा अनेक प्रकारच्या गोष्टी ते खायचे व त्यावर अवलंबुन राहून ते स्वतःचे पोट भरत होते. त्यानंतर त्यांनी पोट भरण्याचे साधन म्हणून शेती करण्यास सुरुवात केली व शेती करण्या करिता खुली जागा मिळावी म्हणून जवळची झाडे तोडून शेती करायला लागले. शेती करताना जंगलाची हानी होणार नाही अशा ठिकाणी त्यांनी शेती करायला सुरुवात केली.

पूर्वी जांगदा हा गाव रांगी च्या एका जमीदाराच्या देखरेखीखाली असायचा नंतर जमीदारी पद्धत बंद झाली आणि आपले आदिवासी स्वतंत्रपणे आपली शेती करत जगू लागले. नंतर या गावांमध्ये इतरही समाजाचे लोक येऊन राहू लागले. (आदिवासी मध्येच आणखी चार पोटजातीचे लोक आहेत गोंड, राजगोंड, गोवारी, परधान) नंतर गवळी, खाती, सोनार ह्या समाजाचे लोक येऊन राहू लागले. आणि आता वनहक्क कायद्याने यांना पारंपरिक वन निवासी असे नाव दिले. अशाप्रकारे या गावाचा विस्तार होउन हळूहळू गावाची लोकसंख्या वाढत होती व तसे तसे गावपण वाढत होते. त्यापैकी काही आदिवासी जिथे आपली शेती आहे तिथेच जाऊन राहायचे किंवा बाहेरून आलेले आदिवासी गावातील पुढारीला विचारून जवळच्याच

जंगलात जाऊन शेती काढून तिथेच राहू लागले, मग पुन्हा कुणीतरी येऊन तिथेच घर आणि शेती काढायला लागले असे करत करत त्यांनी आपापले स्वतंत्र पाळे तयार केले. (पाळे/पाळा म्हणजेच टोला/टोले).

पूर्वी जांगद्याला एकूण 7 टोले होते. त्यापैकी एक टोला मिळून एक गाव घोषित झाला मेटेजांगदा (म्हणजे डोंगरात असलेला जांगदा). आणि 3 टोले मिळून एक गाव घोषित झाला मोडेभट्टी. आता आमच्या ग्रामसभेला फक्त 3 टोले राहिले आहेत खैरी टोला ( खैराच्या झाडाच्या नावाने याचे नामकरण झाले) , इतुम टोला(इतुम झाडाच्या नावाने याचे नाव पडले), आणि मडावी टोला (आडनावावरून याचे नाव पडले). यानंतर 6 मे 2013 मध्ये गावाला वनहक्क मिळाले आणि 2013 मध्येच या तीन पाड्यांना सोबत घेऊन जांगदा ग्रामसभा तयार करण्यात आली. वनहक्का अंतर्गत 3 कंपार्टमेंट मिळाले त्या तिन्ही कंपार्टमेंटची जिमेदारी ज्यांच्याकडे जेवढा जंगल आहे तेव्हढ्या जंगलाची राखण किवा गस्त त्याच पाड्याचे लोक करतील म्हणून देण्यात आली. ती तशीच ग्रामसभा आजपर्यंत सुरळीतपणे चालू आहे.

## 1.4 गावाची प्राथमिक माहिती

| | |
|---|---|
| **गावाचे नाव** | जांगदा बु. |
| **ग्रामपंचायत** | जांगदा बु. |
| **तालुका** | धानोरा |
| **जिल्हा** | गडचिरोली |
| **गावातील कुटुंबाची संख्या- 98** | अनुसूचित जमाती (ST)- 87 |
| | भटक्या जमाती(NT)- 10 |
| | ओबीसी(OBC)- 1 |
| | पारंपारिक वननिवासी लोकसंख्या- 35 |
| | |
| **पुरुष लोकसंख्या** | 146 |
| **स्त्री लोकसंख्या** | 153 |
| **एकूण लोकसंख्या** | 299 |
| **अनुसूचित जमाती लोकसंख्या** | 264 |
| **किती टोले आहेत (नावे लिहा)** | मडावी टोला, खैरी टोला, इतुम टोला |

## 1.5 गावाची भौगोलिक माहिती

| अ. क्र. | खात्याचे प्रकार | क्षेत्र हे. |
|---|---|---|
| 1 | वन | 456 |
| 2 | झुडपी जंगल | 0 |
| 3 | आखर | 4 |
| 4 | गावठाण | 6 |
| 5 | तलाव/बोडी | 5 |
| 6 | मसानवट | 2 |
| 7 | ढोरफोडी | 1 |
| 8 | पाट | 1 |
| 9 | खातखुड्या | 0 |
| 10 | रस्ते | 2 |
| 11 | नदी/नाले | 5 |
| 12 | पोटखराब | 3 |
| | **एकूणक्षेत्र** | **485** |

| अ. क्र. | खात्याचे प्रकार | क्षेत्र हे. |
|---|---|---|
| 1 | बागायत | 0 |
| 2 | जिरायत | 435 |
| | **एकूण** | **435** |



सामुहिक वनक्षेत्र (चित्र- दालदेऊळ वरून)

## 1.6 गावाची व्यवसाया संबंधी माहिती

| व्यवसाय | कुटुंबाची संख्या |
|---|---|
| शेती | 93 |
| पशुधन | 75 |
| दुधाचा व्यवसाय | 1 |
| वनउपज गोळा करणारी कुटुंब | 90 |

## 1.7 पोलो - निसर्गाशी संबंधित सन

| अ.क्र. | नाव | महिना | कृती | महत्व |
|---|---|---|---|---|
| 1 | बिजाई | मे | ठाकूर देवा जवळ नवीन बीज काढणे, | नवीन बीज काढणे, त्यानंतर शेतामध्ये बीज पेरणीस सुरुवात होते. |
| 2 | डहूरपाणी पोलो | जून | नाल्यात पूजा करतात | पहिला पाणी असल्याने डहूर/खराब असते त्यासाठी पोलो करतात. नंतर पाणी सुद्ध होते. |
| 3 | बिजोरी | जुलै | ठाकूर देव जवळ बीजाई नेऊन पूजा केल्या जाते. | हि पोलो केल्या नंतर शेतावर शिदोरी घेऊन जाता येते , हि पोलो झाल्यावर घर छावता येते. |
| 4 | भीमान मर्मी | जुलै | हि पोलो भीमदेव जवळ करतात. देवाला मातीने लीपतात. | पाणी येहो यासाठी हि पोलो करण्यात येते. या वेळेस देवाला मातीने लीपतात. |
| 5 | आकाळी पोलो | जुलै | गाव देहारी च्या घरच्या पाटपिळा जवळ हि पूजा केल्या जाते. | या वेळेस वर,धोबे,मोहटी, कडू कांदा इत्यादी वनस्पती देवाला देऊन मग आपण खायला सुरुवात होते. |
| 6 | मंगळवार पोलो | श्रावण महिन्यात | माराई शेळो (गाव माऊली) जवळ करतात. | गावात रोगराई होऊ नये यासाठी ५ मंगळवार पकडून हि पोलो करतात. |
| 7 | शनिवार पोलो | ऑगष्ट | भीमदेव जवळ पूजा करून तिथला पाणी नेऊन शेतात टाकतात. | शेतावर रोगराई येऊ नये म्हणून हि पोलो करतात. |
| 8 | पोळा पोलो | ऑगष्ट | गाव माऊली व महादेव मंदिरात | बैल शेतात कष्ट करते म्हणून त्याच्या नावाने हि पोलो केल्या जाते. |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | | | नेऊन पूजा केली जाते. | |
| 9 | मारभत पोलो | ऑगष्ट | गावाच्या शिव जवळ पूजा केल्या जाते. | गावातील रोगराई जाहो यासाठी हि पोलो करतात या वेळेस मारभत, बिबा,रांजी,गोंगल, पळस,बेल,गराडी, भेरा,करकरी चे फुल इत्यादी वनस्पतींना विशेष महत्व देऊन त्याची पूजा केल्या जाते. |
| 10 | नवा पोलो | सप्टेंबर | ठाकूर देव जवळ | नवीन पिक देवाला चढवल्या जाते. |
| 11 | दसरा | ऑक्टोंबर | गाव देहारी च्या घरच्या पाटपिळा जवळ हि पूजा केल्या जाते. | या वेळेस कोहळा,दोडका,सेहरा, या वनस्पतींना देवाजवळ ठेवल्या जाते तेव्हा पासूनच ती वनस्पती वापरायला सुरुवात होते. |
| 12 | संजोरी | ऑक्टोंबर | ठाकूर देव जवळ नवीन पिक देतात. | हि पोलो झाल्यावरच चुर्ना करायला सुरुवात होते. |
| 13 | बस्का | ऑक्टोंबर | गावाच्या गायींच्या आकरावर हि पूजा केल्या जाते. | गायींची पूजा केल्या जाते. गायींना किवा इतर जनावरांना काही रोगराई होऊ नये म्हणून हि पूजा केल्या जाते. |
| 14 | मोहडोंगरी पोलो | मार्च | मोहाच्या झाडाची पूजा करतात. | हि पोलो झाल्यानंतर मोह वेचायला सुरुवात होते. |
| 15 | होळी पोलो | मार्च | गावातील चौकात होळी पेटवून नैवद्य देऊन पूजा केल्या जाते. | या दिवशी सावरी च्या झाडाला महत्व दिल्या जाते या झाडाची फांदी त्या होळीत भाजून त्याची दोरी हाताला बांधतात. |

## गावातील सामुहिक देवस्थान

| अ.क्र. | नाव | स्थान |
|---|---|---|
| 1 | नार माता/ गाव माउली/ माराई | गावात |
| 2 | गढ माता | जंगलात |
| 3 | पाट देव | जंगलात |
| 4 | ठाकूर देव/चिकाटी/ भूम्याल / तल्लूर मुते | शेतात |
| 5 | महादेव | तलाव (इतूम टोला) |
| 6 | भीम देव | पटची दान |
| 7 | बजरंग बली | गावात |



**नार माता/ गाव माउली/ माराई**



## 1.8 संघटन

गावामध्ये कोणतेही सामूहिक काम करायचे असल्यास त्यासाठी एखादी संघटना किंवा समिती असणे आवश्यक आहे. अन्यथा तो काम कधीच चांगला होत नाही कारण त्या कामावर कुणाचीही लक्ष राहत नाही.त्यामुळे गावामध्ये सुद्धा असे काही समित्या स्थापन करणे आवश्यक असते.

1) वनहक्क समिती
2) सनियंत्रण समिती
3) जैवविविधता समिती
4) बँकेच्या व्यवहारासाठी समिती
5) वेगवेगळे पास देण्यासाठी समिती
6) तंटामुक्त समिती
7) लेखापाल



**जिल्हा प्रशासन सोबत ग्रामसभेचा सामंजस्य करार.**

यासाठी योग्य व्यक्ती आणि गरजेनुसार समिती तयार करणे आवश्यक आहे.

## 1.9 इतर ग्रामसभा व महासंघाशी संबंध

गावाजवळ असलेले सर्व ग्रामसभा एकत्र मिळून तेंदू लिलावसारख्या प्रक्रियेत सहभाग घेतात. एखाद्या गावाला काही अडचण किंवा फसवणूक झाल्यास ते आधी आपल्या जवळच्या ग्रामसभाशी चर्चा करून नंतर महासंघमध्ये विषय मांडतात.

## 1.10 गावात असलेल्या सुविधा

गावातील सेवा, सुविधा आणि त्यांचे अंतर खालील प्रमाणे आहे-

| अ.क्र. | सुविधा व यंत्र संसाधन | हो/ नाही | अंतर |
|---|---|---|---|
| 1 | प्राथमिक शाळा | हो | गावात |
| 2 | मिनी अंगणवाडी | हो | गावात |
| 3 | गट ग्रामपंचायत कार्यालय | हो | गावात |
| 4 | आरोग्य उपकेंद्र | हो | गावात |
| 5 | तलाठी कार्यालय | नाही | 3.5 किमी |
| 6 | स्वस्त धान्य दुकान | हो | गावात |
| | पोष्ट ऑफिस | | 3.5 किमी |
| | तालुका | | 15 किमी |
| | जिल्हा | | 45किमी |



## 1.11 पशुधन माहिती

| अ.क्र. | पशुधनाचे प्रकार | संख्या |
|---|---|---|
| 1 | गाय- बैल | 270 |
| 2 | म्हैस- रेडे | 27 |
| 3 | शेळी/बकरे | 223 |
| 4 | कोंबडी | 500 |
| 5 | डुक्कर | 30 |



पशुधन

## 1.12 कृषी पिके हंगाम माहिती

| अ.क्र. | हंगाम | खरीप (हो/नाही) | रब्बी (हो/नाही) |
|---|---|---|---|
| 1 | धान | हो | हो |
| 2 | भाजीपाला | नाही | हो |
| 3 | तूर | नाही | हो |
| 4 | चना | नाही | हो |
| 5 | मुंग | नाही | हो |
| 6 | जवस | नाही | हो |
| 7 | उळीद | नाही | हो |
| 8 | मका | नाही | हो |
| 9 | शेंगदाणे | नाही | हो |

## 1.13 पावसाची सरासरी

| वर्ष | पाऊस (मी.मी.) |
|---|---|
| 2015 | 848 |
| 2014 | 1266 |
| 2013 | 2368 |
| 2012 | 1568 |
| 2011 | 1214 |
| 2010 | 1769 |
| 2009 | 1124 |
| 2008 | 1272 |
| 2007 | 1874 |
| 2006 | 1564 |
| 2005 | 1682 |
| 2004 | 1315 |

## 2. वन व्यवस्थापन आराखड्याविषयी

### 2.1 उद्देश आणि कृती

| उद्देश | कृती |
|---|---|
| 1) वनाचे संरक्षण करणे:- | 1. वनाचे वनव्यापासुन ऱ्हास थांबवणे.<br>2. निसर्गातून मिळणाऱ्या विविध लाभांना, गौण उपजांना वाढविणे व टिकवून ठेवणे<br>3.आपल्या जंगलातून चोरी होणाऱ्या मालाला रोख लावणे व दंडात्मक कार्यवाही करणे.<br>4.जंगल सौरक्षण साठी गावात नियमावली तयार करणे.<br>5.सीमांकन करणे.<br>6.रोपवाटिका तयार करणे.<br>7.औषधी वनस्पती व चराई साठी चारा तयार करणे.<br>8.वनस्पतींची यादी बनवणे.<br>9.वेगवेगळ्या भुदृश्यांची यादी बनवणे.<br>10.जंगलाचे शाश्वत पद्धतीने वापर करणे.<br>11.वेगवेगळ्या भुदृश्यांची नकाशे तयार करणे.<br>12वनस्पती लागवडी नंतर त्यांची निघा राखणे.<br>13.वृक्षांची दर हेक्टरी संख्येचा अंदाज काढणे. |
| 2) जंगलातील जैवविविधतेचे संरक्षण :- | 1) आपल्या जंगलातील जैवविविधतेचे नुकसान होत असल्यास त्यासाठी कृतिशील असणे.उदा. शिकार, अवैध मासेमारी असे अवैध काम होत असल्यास त्यास प्रतिबंध घालणे.<br>2) नष्ट होणाऱ्या वनस्पतींची कारणासहित नोंद ठेवणे |
| 3) स्थलांतर थांबवणे | 1) गावातील तरुण मुलं गावात काम नाही मिळत म्हणून बाहेर कंपनीमध्ये जातात परंतु ठेकेदाराकडून त्यांची फसवणूक होऊन वापस गावात येतात असे प्रकरण थांबविणे. तसेच<br>2) गावातील लोकांना बाहेर रोजगारासाठी जाण्याची वेळ येऊ नये यासाठी गावातच वर्षभर काम पुरले पाहिजे यासाठी वेळोवेळी |

| | |
|---|---|
| | रोजगार हमी किंवा इतर योजनेच्या माध्यमातून काम उपलब्ध करून देणे. |
| 4) रोजगार हमी योजना ग्रामसभा स्वतः राबवेल यासाठी प्रयत्न करणे. | वनहक्क च्या कलम ३(१)(e) नुसार रोजगार हमी यंत्रणा घोषित करणे. |
| 5) ग्रामसभेची फसवणूक टाळणे | 1) गौण वणोपजाची खरेदी ग्रामसभेतच करणे व ग्रामसभेतर्फे त्याची विक्री करणे.<br>2) गौण उपजांची मूल्यसंवर्धन व विक्री साखळी तयार करणे.<br>3) तेंदु व बांबू प्रक्रिया स्वतः ग्रामसभे मार्फत करणे.<br>4) गावात नियम तयार करणे,उदा,(ग्रामसभेचे , जंगलाचे, गौणउपज वापराचे, आर्थिक व्यवहार, निस्तार काढण्याचे ,इत्यादी) |

## 2.2 सामुहिक वनसंपत्ती क्षेत्राचा तपशील

**गावाच्या गावहद्दी येणाऱ्या वनक्षेत्राची माहिती खालील प्रमाणे-**

**A) कंपार्टमेंट नंबर तपशील :-**

| अ.क्र. | कंपार्टमेंट नंबर | राखीव जंगल | संरक्षित जंगल | इतर | एकूण क्षेत्र |
|---|---|---|---|---|---|
| 1 | 588 | 97.98 | 30.49 | 16.50 | 144.97 |
| 2 | 568 | 189.12 | 4.4 | 76.57 | 270.09 |
| 3 | 569 | 563.65 | 4.19 | | 567.84 |
| एकूण क्षेत्र | | 850.75 | 39.08 | 93.07 | 982.9 |

## B) सर्व्हे नंबर तपशील :-

(* स.व.वि- सरकार वन विभाग, * स.झु.जं- सरकार झुडपी जंगल
*सि.तू.पो- सिंधुबाई तुळशीराम पोरेटी, * रा.ना.प- रामचंद्र नाजुकराव पदा)

| अ.क्र. | सर्व्हे नंबर | विभाग | क्षेत्र हेक्टर | अ.क्र. | सर्व्हे नंबर | विभाग | क्षेत्र हेक्टर |
|---|---|---|---|---|---|---|---|
| 1 | 1 | स.व.वि | 3.50 | 2 | 4 | स.व.वि | 8.65 |
| 3 | 7/1 | स.व.वि | 41.46 | 4 | 11 | स.व.वि | 6.80 |
| 5 | 12/1 | स.व.वि | 5.81 | 6 | 16 | स.झु.जं | 2.40 |
| 7 | 18 | स.झु.जं | 0.24 | 8 | 19 | स.व.वि | 0.32 |
| 9 | 22 | स.व.वि | 2.78 | 10 | 24 | स.झु.जं | 0.03 |
| 11 | 52 | स.व.वि | 8.39 | 12 | 57 | स.व.वि | 37.96 |
| 13 | 61 | स.व.वि | 0.62 | 14 | 62/1 | स.व.वि | 25.66 |
| 15 | 64 | स.व.वि | 1.05 | 16 | 68 | स.झु.जं | 0.18 |
| 17 | 71 | स.व.वि | 6.13 | 18 | 74 | स.व.वि | 1.80 |
| 19 | 76 | स.झु.जं | 0.43 | 20 | 92/1 | स.झु.जं | 1.09 |
| 21 | 93 | स.झु.जं | 0.52 | 22 | 99/1 | स.व.वि | 0.59 |
| 23 | 103 | स.झु.जं | 0.12 | 24 | 104/1 | स.झु.जं | 0.01 |
| 25 | 105/1 | स.व.वि | 1.50 | 26 | 120 | स.व.वि | 1.22 |
| 27 | 127/1 | स.व.वि | 4.58 | 28 | 129/1 | स.व.वि | 117.40 |
| 29 | 169 | सि.तू.पो | 2.19 | 30 | 172 | स.व.वि | 12.72 |
| 31 | 197 | स.व.वि | 0.35 | 32 | 198 | स.झु.जं | 0.05 |
| 33 | 199 | स.झु.जं | 0.13 | 34 | 203 | स.झु.जं | 0.04 |
| 35 | 205 | स.व.वि | 0.13 | 36 | 207 | स.व.वि | 2.08 |
| 37 | 209 | रा.ना.प | 3.85 | 38 | 210 | स.व.वि | 0.18 |
| 39 | 213/1 | स.व.वि | 4.22 | 40 | 215 | स.व.वि | 0.94 |
| 41 | 218/1 | स.व.वि | 7.01 | 42 | 219 | स.झु.जं | 3.92 |
| 43 | 220 | स.व.वि | 26.09 | 44 | 221 | स.व.वि | 0.56 |
| 45 | 223 | स.व.वि | 4.79 | 46 | 229 | स.व.वि | 1.21 |
| 47 | 233 | स.झु.जं | 0.05 | 48 | 235 | स.व.वि | 7.52 |
| 49 | 239 | स.व.वि | 17.02 | 50 | 249 | स.व.वि | 2.72 |
| 51 | 250 | स.व.वि | 12.54 | 52 | 252 | स.व.वि | 10.61 |
| एकूण क्षेत्र :- 402.16 हे. | | | | | | | |

**वनक्षेत्राच्या चतु:सीमा ची माहिती -**

**पूर्व-** मेटेजांगदा बॉर्डर कक्ष क्रमांक 570

**पश्चिम-** मोहली बॉर्डर कक्ष क्रमांक 563

**उत्तर-** सिंसुर बॉर्डर कक्ष क्रमांक 560

**दक्षिण-** पुसावंडी बॉर्डर कक्ष क्रमांक 602

**मेटेजांगदा,मोडेभट्टी आणि जांगदा सीमा**

## 2.3 सीमा व हद्दीची स्थिती

आमच्या गावाच्या सभोवताल च्या गावांमध्ये सीमा संबंधित कोणत्याही प्रकारचा वाद विवाद नाही आहे. तरीही काही गावांमध्ये जंगल नसल्याने त्या गावातील लोक आमच्याच जंगलावर अवलंबून राहतात. त्यामुळे त्यांना आमच्या जंगलातून जळाऊ लाकूड , बांबू,चराई साठी जागा, हे द्यावेच लागते. परंतु ते नियमानुसार आम्ही देतो आणि त्यांना सूचना केली आहे की आमच्या ग्रामसभेची पास घेतल्याशिवाय कोणतीही वस्तू नेता येणार नाही. परंतु काही जे मुजोर लोक आहेत ते मात्र चोरी करण्यास तयारच असतात. त्यामुळे फक्त गावाच्या दक्षिण दिशेकडील जंगलातून रात्री मालाची चोरी होत राहते. गावातील लोकांची गस्त चालू राहते परंतु दिवसा न जाता रात्री तरी चोरी करतात. गावातील सर्व लोकांनी मिळून 3 दिवस श्रमदानाने सीमा साफ केली. आता सीमा पूर्णपणे साफ केली आहे, तसेच जुन्या काळातील मुणारे ज्या ठिकाणी नव्हते त्या ठिकाणी खांब रोवले आहेत.

## 2.4 समुदायीक वन हक्क प्राप्त जंगलावरील सद्यस्थितीतील अडचणी व धोके

१) **आंतरिक धोके :-** वणवा, वृक्षतोड, अतिक्रमण,बिमारी, हवामान बदल

२) **बाह्य धोके:-** वणवा, वृक्षतोड,चोरी,

**जंगलाला लागलेली आग व त्यापासून बांबू ची नुकसान**

## 2.5 जमिनीचा वापर तक्ता:

| जमिनीचा वापर | क्षेत्रफळ (हे) |
|---|---|
| तलाव | 2 |
| नाला | 2 |
| समशान भूमी | 1 |
| जंगल | 456 |
| गावठाण | 5 |
| शेती | 365 |

## 2.6 भूभाग/जलभाग यादी

| तुकडा क्रमांक | भुदृश्य प्रकार | भूरचना |
|---|---|---|
| 14 | २२. मध्यम वृक्ष मैदानी (गवत) | सपाट |
| 13 | २८. दाट वृक्ष मैदानी (गवत) | सपाट |
| 12 | ८. मध्यम वृक्ष खडकाळ (मिश्र) | सपाट |
| 11 | ८. मध्यम वृक्ष खडकाळ (मिश्र) | उंचसखल |
| 10 | ३० शेती | सपाट |
| 9 | १. खूप कमी वृक्ष मैदानी (मिश्र) | सपाट |
| 8 | १०. दाट वृक्ष डोंगराळ (मिश्र) | उभा चढ |
| 7 | ४. विरळ वृक्ष मैदानी (मिश्र) | सपाट |
| 6 | १८. विरळ वृक्ष मैदानी (गवत) | सपाट |
| 5 | २७ . दाट वृक्ष डोंगराळ (बांबू) | मध्यम चढ |
| 4 | २५. मध्यम वृक्ष डोंगराळ (बांबू) | उभा चढ |
| 3 | ७. मध्यम वृक्ष मैदानी (मिश्र) | सपाट |
| 2 | ११. दाट वृक्ष मैदानी (मिश्र) | सपाट |
| 1 | ७. मध्यम वृक्ष मैदानी (मिश्र) | सपाट |

## 2.8 वनक्षेत्रातील टापू (पारंपारिक/विशिष्ट नावाने ओळखल्या जाणारी जागा) माहिती

| टापूची नावे | अंदाजे क्षेत्रफळ (हे) | टापू विषयी माहिती |
|---|---|---|
| पाट कोहळा | 7 | पाटदेवाच्या नावाने ठेवले |
| निराल पांजा | 10 | या भागात बिबट राहायचा |
| बंडरीन हुडकी- (इतूम टोला) | 2 | दिलवरी करत असताना मरण पावलेल्या स्त्रियांची स्मशान भूमी |
| चूळयाल डोंगर | 50 | तिथे गेल्यावर लोक भूलतात म्हणून याचे नाव असे आहे. |
| कल्लोडच्या डोंगर | 50 | या ठिकाणी कल्लोडच्या चे झाड जास्त असल्याने याचे नाव असे पडले |
| मुरूम कोहळा | 10 | या भागात मुरूम जास्त आहे |
| पटाची दान | 10 | या ठिकाणी पट भरायची |
| चीचबन | 2 | या ठिकाणी चिंच जास्त आहे |
| टेकर | 2 | या भागात जास्त वनस्पती नाही म्हणून |
| आकर | 2 | या भागात गायींना विश्रांती करायला थांबवितात |
| मानोरा गुडरा | 20 | माना समाजाचे लोक राहायचे म्हणून |
| दाल देऊळ | 30 | देवाच्या नावाने |
| लया पाळी | 40 | मुलींनी मिळून डोंगरावर पार तयार केली म्हणून |
| लया खिंडी | 10 | मुलींनी मिळून डोंगरावर पार तयार केली त्यात खिड असल्याने |
| ठाकूर देव | 1 | ठाकूर देव असल्यामुळे |
| मर्मी गुडरा | 50 | लग्नासाठी लागणारे साहित्य त्याच ठिकाणाहून आणले जातात |
| ढोली गोटा | 5 | त्या ठिकाणी ढोली सारखा दिसणारा गोटा असल्यामुळे |
| बंडरीन हुडकी- (जांगदा) | 2 | दिलवरी करत असताना मरण पावलेल्या स्त्रियांची स्मशान भूमी |
| बंडरीन हुडकी- (मडावी टोला) | 2 | दिलवरी करत असताना मरण पावलेल्या स्त्रियांची स्मशान भूमी |

| | | |
|---|---|---|
| पांढरी हुडकी | 30 | त्या ठिकाणी पांढरे गोटे आहेत म्हणून |
| लाल माती हुळकी | 30 | त्या ठिकाणी लाल माती असल्यामुळे |
| लबानडार्णी | 30 | लबान समाजाचे लोक तिथे राहायचे म्हणून. |
| सेहरी गुडरा | 40 | त्या ठिकाणी जास्त प्रमाणात सेहरा चे झाडे असल्याने |

## 2.9 वृक्षांचा विविध भूभागावर संख्यात्मक अंदाज

| **1. भुदृश्य प्रकार** | **९. मध्यम वृक्ष डोंगराळ (मिश्र)** | **कोणत्या टापुचा भाग-: मैदान 1,नर्सरी** | |
|---|---|---|---|
| **क्र.** | **वृक्ष** | **वृक्ष संख्या प्रती हेक्टर** | **खोड क्षेत्रफळ प्रती हे (.मी.चौ)** |
| 1 | भेरा | 19.85 | 0.6108 |
| 2 | बिजा | 24.81 | 3.051 |
| 3 | चार | 24.81 | 0.4535 |
| 4 | धावला | 14.88 | 0.8139 |
| 5 | धोबीन | 14.88 | 2.6929 |
| 6 | गराडी | 94.29 | 1.9252 |
| 7 | कसई | 9.92 | 0.7636 |
| 8 | कोजूब | 4.96 | 0.4866 |
| 9 | कुळा | 9.92 | 0.2053 |
| 10 | मोह | 39.7 | 2.8384 |
| 11 | पळस | 4.963 | 0.1421 |
| 12 | रेला | 4.96 | 0.0631 |
| 13 | साग | 29.77 | 0.9554 |
| 14 | सिहना | 24.81 | 1.3722 |
| 15 | तेंदू | 29.77 | 2.0386 |
| 16 | येन | 64.51 | 3.4633 |
| **एकुण वृक्ष संख्या** | **प्रती हेक्टर** | **416.8981783** | |
| | | | |
| **2. भुदृश्य प्रकार** | **१० दाट वृक्षडोंगराळ . (मिश्र)** | **कोणत्या टापुचा भाग-: लया पाळी, सुड्याल** | |

| | | डोंगर,हुडकी 3 | |
|---|---|---|---|
| **क्र.** | **वृक्ष** | **वृक्ष संख्या प्रती हेक्टर** | **खोड क्षेत्रफळ प्रती हे (.मी.चौ)** |
| 1 | बाहवा | 4.23 | 0.393 |
| 2 | बांबू | 88.93 | 67.6094 |
| 3 | भेरा | 38.11 | 1.2763 |
| 4 | बिजा | 25.41 | 1.3422 |
| 5 | चार | 4.23 | 0.3506 |
| 6 | चिचवा | 8.47 | 1.6936 |
| 7 | धावडा | 12.7 | 1.2628 |
| 8 | धोबीन | 4.23 | 0.5435 |
| 9 | गराडी | 50.82 | 2.0861 |
| 10 | घोगर | 4.23 | 0.2156 |
| 11 | गोटा गराडी | 8.47 | 0.2975 |
| 12 | हाले | 4.23 | 0.4227 |
| 13 | करारुख | 8.47 | 0.6142 |
| 14 | कसई | 21.17 | 0.7567 |
| 15 | कोजूब | 4.23 | 0.4077 |
| 16 | कुळा | 4.23 | 0.1213 |
| 17 | मोह | 8.47 | 1.5612 |
| 18 | पिंपळ | 4.23 | 0.0163 |
| 19 | साग | 50.82 | 2.8881 |
| 20 | सावरी | 8.47 | 0.3119 |
| 21 | सिहना | 29.64 | 0.5326 |
| 22 | तेंदू | 8.47 | 0.8302 |
| 23 | वळमा | 12.7 | 0.5675 |
| 24 | येन | 25.41 | 4.4793 |
| **एकुण वृक्ष संख्या** | **प्रती हेक्टर** | **440.445034** | |
| | | | |
| **3. भुदृश्य प्रकार** | **7. मध्यम वृक्षमैदानी (मिश्र)** | **कोणत्या टापुचा भाग-: पाट कोहळा2** | |

| क्र. | वृक्ष | वृक्ष संख्या प्रती हेक्टर | खोड क्षेत्रफळ प्रती हे (.मी.चौ) |
|---|---|---|---|
| 1 | भेरा | 34.2 | 0.722 |
| 2 | बिजा | 51.3 | 7.0742 |
| 3 | चार | 17.1 | 0.3759 |
| 4 | धावडा | 8.55 | 1.1499 |
| 5 | गराडी | 25.65 | 0.7666 |
| 6 | घोगर | 8.55 | 0.6804 |
| 7 | कसई | 8.55 | 0.5511 |
| 8 | लोगडी | 25.65 | 0.5556 |
| 9 | मोह | 51.3 | 4.5109 |
| 10 | पळस | 8.55 | 0.1633 |
| 11 | पालोड | 8.55 | 0.0329 |
| 12 | सावरी | 8.55 | 0.7079 |
| 13 | सिहना | 25.65 | 0.1667 |
| 14 | तेंदू | 25.65 | 1.8263 |
| 15 | येन | 102.6 | 6.4936 |
| **एकुण वृक्ष संख्या** | **प्रती हेक्टर** | **410.4330887** | |
| | | | |
| **4. भुदृश्य प्रकार** | **23. मध्यम वृक्षमैदानी (बाम्बु)** | **कोणत्या टापुचा भाग-: कल्यानझोरा,कोडा कळका,गावळे पल्ला** | |
| **क्र.** | **वृक्ष** | **वृक्ष संख्या प्रती हेक्टर** | **खोड क्षेत्रफळ प्रती हे (.मी.चौ)** |
| 1 | अर्जुन | 10.35 | 0.2412 |
| 2 | बाहवा | 15.52 | 0.2802 |
| 3 | बांबू | 5.17 | 0 |
| 4 | बेहळा | 5.17 | 0.6435 |
| 5 | भेरा | 31.05 | 0.4401 |
| 6 | बिजा | 5.17 | 0.6642 |
| 7 | चार | 10.35 | 0.1597 |

| | | | |
|---|---|---|---|
| 8 | धावडा | 5.17 | 0.0658 |
| 9 | गराडी | 15.52 | 0.4211 |
| 10 | झिलबुली | 5.17 | 0.1245 |
| 11 | काकई | 5.17 | 0.0421 |
| 12 | कोजूब | 5.17 | 0.7176 |
| 13 | कुळा | 10.35 | 0.0481 |
| 14 | लोगडी | 10.35 | 0.0871 |
| 15 | मोह | 46.57 | 1.7932 |
| 16 | पळस | 15.52 | 0.37 |
| 17 | रोहन | 10.35 | 1.7462 |
| 18 | साग | 82.8 | 1.9168 |
| 19 | सिहना | 20.7 | 0.8453 |
| 20 | तेंदू | 56.93 | 0.7559 |
| 21 | उमरून | 5.17 | 0.0909 |
| 22 | येन | 56.93 | 1.1778 |
| **एकुण वृक्ष संख्या** | **प्रती हेक्टर** | **434.7391131** | |
| | | | |
| **5. भुदृश्य प्रकार** | **५ विरळ.वृक्षखडकाळ (मिश्र(** | **कोणत्या टापुचा भाग-: लया पाळी,लयाखिंडी,पाट कोहळा 1** | |
| **क्र.** | **वृक्ष** | **वृक्ष संख्या प्रती हेक्टर** | **खोड क्षेत्रफळ प्रती हे (.मी.चौ)** |
| 1 | Avada | 3.85 | 0.0294 |
| 2 | बांबू | 3.85 | 0 |
| 3 | भेरा | 23.13 | 0.3608 |
| 4 | बिजा | 11.56 | 0.6156 |
| 5 | चार | 3.85 | 0.0861 |
| 6 | धावडा | 19.27 | 0.7124 |
| 7 | फिफुली | 3.85 | 0.168 |
| 8 | गराडी | 15.42 | 0.7741 |

| | | | |
|---|---|---|---|
| 9 | घोगर | 3.85 | 0.0767 |
| 10 | हळदु | 3.85 | 0.0706 |
| 11 | जांभरून | 3.85 | 0.0649 |
| 12 | लोगडी | 7.71 | 0.0483 |
| 13 | मोह | 26.98 | 0.5268 |
| 14 | पळस | 11.56 | 0.3893 |
| 15 | कुळा | 3.85 | 0.0162 |
| 16 | रोहन | 7.71 | 0.4754 |
| 17 | साग | 7.71 | 0.6175 |
| 18 | तेंदू | 50.12 | 1.0738 |
| 19 | येन | 50.12 | 1.7846 |
| **एकुण वृक्ष संख्या** | **प्रती हेक्टर** | **262.1689706** | |
| | | | |
| **6. भुदृश्य प्रकार** | **27. दाट वृक्ष डोंगराळ (बाम्बु)** | **कोणत्या टापुचा भाग-: हुडकी2** | |
| **क्र.** | **वृक्ष** | **वृक्ष संख्या प्रती हेक्टर** | **खोड क्षेत्रफळ प्रती हे (.मी.चौ)** |
| 1 | बांबू | 27.85 | 0 |
| 2 | भेरा | 55.71 | 2.6859 |
| 3 | बिजा | 27.85 | 4.3451 |
| 4 | गराडी | 55.71 | 0.7672 |
| 5 | कसई | 83.57 | 3.3696 |
| 6 | कोजूब | 27.85 | 2.6824 |
| 7 | साग | 167.15 | 5.6721 |
| 8 | सावरी | 55.71 | 4.5446 |
| 9 | सिहना | 27.85 | 0.1995 |
| 10 | सूर्या | 27.85 | 1.4188 |
| **एकुण वृक्ष संख्या** | **प्रती हेक्टर** | **557.1672469** | |
| | | | |
| **7. भुदृश्य प्रकार** | **4. विरळ वृक्षमैदानी (मिश्र)** | **कोणत्या टापुचा भाग-: बंडरिन हुडकी** | |

| क्र. | वृक्ष | वृक्ष संख्या प्रती हेक्टर | खोड क्षेत्रफळ प्रती हे (.मी.चौ) |
|---|---|---|---|
| 1 | बाहवा | 10.28 | 0.0736 |
| 2 | बेल | 10.28 | 0.0736 |
| 3 | भेरा | 10.28 | 0.0837 |
| 4 | मोह | 41.12 | 31.1789 |
| 5 | सावरी | 10.28 | 0.112 |
| 6 | सिहना | 10.28 | 0.0736 |
| 7 | तेंदू | 82.25 | 4.1715 |
| 8 | येन | 30.84 | 1.2944 |
| **एकुण वृक्ष संख्या** | **प्रती हेक्टर** | **205.6356411** | |
| | | | |
| **8. भुदृश्य प्रकार** | **28. दाट वृक्ष डोंगराळ(गवत)** | **कोणत्या टापुचा भाग-: मैदान2** | |
| **क्र.** | **वृक्ष** | **वृक्ष संख्या प्रती हेक्टर** | **खोड क्षेत्रफळ प्रती हे (.मी.चौ)** |
| 1 | बेल | 28.11 | 0.8053 |
| 2 | भेरा | 84.33 | 2.4796 |
| 3 | बिजा | 84.33 | 9.4466 |
| 4 | चार | 28.11 | 0.5592 |
| 5 | धावडा | 56.22 | 3.4549 |
| 6 | गराडी | 56.22 | 0.378 |
| 7 | कुळा | 28.11 | 0.1082 |
| 8 | मोह | 28.11 | 2.7067 |
| 9 | साग | 28.11 | 5.0331 |
| 10 | सिहना | 56.22 | 0.9668 |
| 11 | तेंदू | 140.55 | 3.7674 |
| 12 | येन | 56.22 | 2.4915 |
| **एकुण वृक्ष संख्या** | **प्रती हेक्टर** | **674.6500253** | |
| | | | |
| **9. भुदृश्य प्रकार** | **22. मध्यम वृक्षमैदानी** | **कोणत्या टापुचाभाग-:** | |

| | (गवत) | हुडकी,कल्लोडचा | |
|---|---|---|---|
| **क्र.** | **वृक्ष** | **वृक्ष संख्या प्रती हेक्टर** | **खोड क्षेत्रफळ प्रती हे (.मी.चौ)** |
| 1 | भेरा | 44.62 | 3.3693 |
| 2 | बिजा | 14.87 | 1.7188 |
| 3 | चार | 14.87 | 0.1207 |
| 4 | धावडा | 22.31 | 0.8988 |
| 5 | धोबीन | 7.43 | 0.6036 |
| 6 | गराडी | 66.93 | 1.5688 |
| 7 | घोगर | 14.87 | 0.0497 |
| 8 | गोटा गराडी | 14.87 | 0.0601 |
| 9 | हाले | 7.43 | 0.1145 |
| 10 | कल्लोडचां | 14.87 | 0.0804 |
| 11 | कय्या | 7.43 | 1.0001 |
| 12 | लोगडी | 7.43 | 0.0532 |
| 13 | मोह | 14.87 | 0.8408 |
| 14 | पालोड | 14.87 | 0.0801 |
| 15 | रेला | 7.43 | 0.2736 |
| 16 | साग | 44.62 | 3.962 |
| 17 | सावरी | 37.18 | 2.9181 |
| 18 | सिहना | 14.87 | 0.0577 |
| 19 | सूर्या | 22.31 | 0.3994 |
| 20 | तेंदू | 14.87 | 0.4926 |
| 21 | येन | 7.43 | 0.824 |
| **एकुण वृक्ष संख्या** | **प्रती हेक्टर** | **416.462221** | |



**वृक्ष संख्या अंदाज काढण्यासाठी चतकोर पाहणी करतांना पदविका धारक व गावातील तरुण/तरुणी.**





# 3. वनहक्क अंतर्गत मिळणाऱ्या लाभांची गरज आणि वापर तपशील -

## 3.1 वनस्पती वापर तपशील

### शीट 1 (अन्न)

| क्र. | वनउपज | | हंगाम आणि कालावधी | सहभागी कुटुंबांची संख्या | प्रति हंगाम सरासरी गोळा केलेले प्रमाण (%) | |
|---|---|---|---|---|---|---|
| | वनस्पतीचे नाव | वनस्पतीचा भाग | | | समुदायीक क्षेत्रातून | इतर वन क्षेत्रातून |
| 1 | मोह | फुल,फळ | मार्च ते जून | 40 | 50 | 50 |
| 2 | चार | फळ | मार्च | 70 | 99 | 1 |
| 3 | येरोनी | फळ | डिसेंबर ते जानेवारी | 20 | 100 | |
| 4 | बोर | फळ | जानेवारी ते फेब्रुवारी | 90 | 50 | 50 |
| 5 | कुळा | फुल,शेंगा | जून ते जुलै | 70 | 75 | 25 |
| 6 | पिंपळ बार | फुल | जून ते जुलै | 30 | 75 | 25 |
| 7 | सफेद मुसळी | पान | जुलै अगस्त | 40 | 99 | 1 |
| 8 | कळू कांदे | कांदे | डिसेंबर ते जानेवारी | 26 | 99 | 1 |
| 9 | तरोटा | पान | जुलै | 34 | 25 | 75 |
| 10 | कडू भाजी | पान | मे ते जून | 32 | 99 | 1 |
| 11 | चिपळी भाजी | पान | ऑक्टोंबर ते नोव्हेंबर | 3 | 99 | 1 |
| 12 | शेरडीरा | देठ | जुलै ते ऑगष्ट | 8 | 99 | 1 |
| 13 | हळदुली | कांदे | डिसेंबर ते जानेवारी | 23 | 99 | 1 |

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| 14 | पार्सेला | फळ | जानेवारी ते फेब्रुवारी | 5 | 99 | 1 |
| 15 | बोराभाजी | पान | जुलै ते ऑगष्ट | 76 | 99 | 1 |
| 16 | आंबा | फळ | मे ते जून | 98 | 25 | 75 |
| 17 | आवळा | फळ | जानेवारी ते एप्रिल | 51 | 99 | 1 |
| 18 | उमरून | फळ | मे ते जून | 12 | 25 | 75 |
| 19 | कचर कांदे | कांदे | एप्रिल ते मे | 11 | 99 | 1 |
| 20 | कवठ | फळ | एप्रिल ते मे | 6 | 99 | 1 |
| 21 | काटवल | फळ | जुलै ते सप्टेंबर | 90 | 1 | 99 |
| 22 | काटा कोहळा | फळ | नोव्हेंबर ते जानेवारी | 12 | 1 | 99 |
| 23 | काळी मुसळी | पान | जुलै ते ऑगष्ट | 8 | 99 | 1 |
| 24 | कोयार भाजी | पान | जून | 91 | 99 | 1 |
| 25 | कोजूब | फळ | जून ते जुलै | 70 | 99 | 1 |
| 26 | खोबर वेल | मूळ | नोव्हेबर ते जानेवारी | 25 | 99 | 1 |
| 27 | गवतीचाय | पान | बाराही महिने | 2 | 1 | 99 |
| 28 | चिंच | फळ | मे ते जून | 80 | 25 | 75 |
| 29 | बोदेले | फळ | ऑक्टोंबर ते नोव्हेंबर | 80 | 70 | 30 |
| 30 | जांभूळ | फळ | जून ते जुलै | 80 | 70 | 30 |
| 31 | टेंभरून | फळ | एप्रिल ते मे | 90 | 99 | 1 |
| 32 | धोबे | पान | ऑगष्ट ते सप्टेंबर | 80 | 1 | 99 |

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| 33 | पातुर भाजी | पान | जून ते जुलै | 80 | 99 | 1 |
| 34 | बेहळा | फळ | डिसेंबर ते जानेवारी | 17 | 99 | 1 |
| 35 | मटारु | फळ,कांदे | नोव्हेंबर ते डिसेंबर | 98 | 1 | 99 |
| 36 | बांबू | कोंब | ऑगष्ट ते सप्टेंबर | 98 | 99 | 1 |
| 37 | डुंबर सात्या | दांडी | ऑगष्ट | 98 | 99 | 1 |
| 38 | येरू सात्या | दांडी | ऑक्टोंबर | 86 | 99 | 1 |
| 39 | गुंजा | पान | डिसेंबर | 22 | 99 | 1 |
| 40 | सुरुंद कांदे | कांदे | नोव्हेंबर ते मे | 98 | 98 | 2 |
| 41 | वर | दांडी | जुलै ते ऑगष्ट | 86 | 99 | 1 |
| 42 | सेलवट | फळ | मार्च | 25 | 90 | 10 |
| 43 | अरकफरी | कोवळे पान | एप्रिल | 67 | 99 | 1 |
| 44 | वराकली | फळ | मार्च ते एप्रिल | 33 | 99 | 1 |
| 45 | भटाळ सात्या | देठ | सप्टेंबर | 98 | 99 | 1 |


वास्ते


येरू सात्या


जांभूळ


कळू भाजी





## 3.2 वनस्पती वापर तपशील

### पत्रक 2 (चारा)

| क्र. | वनउपज | | हंगाम आणि कालावधी | प्रति हंगाम सरासरी वापर केलेले प्रमाण | |
|---|---|---|---|---|---|
| | वनस्पतीचे नाव | वनस्पतीचा भाग | | समुदायीक क्षेत्रातून | इतर वन क्षेत्रातून |
| 1 | चिपळी भाजी | पान | नोव्हेंबर ते फेब्रुवारी | 90 | 10 |
| 2 | बुरबुस जाळी | पान | ऑगष्ट ते डिसेंबर | 90 | 10 |
| 3 | कार जाळी | पान | ऑगष्ट ते डिसेंबर | 90 | 10 |
| 4 | डोगाल जाळी | पान | ऑगष्ट ते डिसेंबर | 90 | 10 |
| 5 | बरटूम | पान | ऑगष्ट ते डिसेंबर | 90 | 10 |
| 6 | पुतेर जाळी | पान | ऑगष्ट ते डिसेंबर | 90 | 10 |
| 7 | जुनाक जप्पी | पान | जून ते मार्च | 90 | 10 |
| 8 | हिकुम जप्पी | पान | जून ते मार्च | 90 | 10 |
| 9 | पर्सेला | पान | जून ते मार्च | 90 | 10 |
| 10 | बिलायकोजी | पान | जून ते मार्च | 90 | 10 |
| 11 | दुधूम | पान | जून ते मार्च | 90 | 10 |
| 12 | बोराभाजी | पान | ऑगष्ट ते डिसेंबर | 90 | 10 |
| 13 | कोरहुची | पान | ऑगष्ट ते डिसेंबर | 90 | 10 |
| 14 | उतरण वेल | पान | जून ते मार्च | 90 | 10 |
| 15 | उमरून | पान | जून ते मार्च | 90 | 10 |
| 16 | उरसुळी | पान | ऑगष्ट ते डिसेंबर | 90 | 10 |
| 17 | एरोनी | पान | जून ते मार्च | 90 | 10 |
| 18 | कसई | पान | जून ते मार्च | 90 | 10 |
| 19 | काटा भाजी | पान | ऑगष्ट ते डिसेंबर | 90 | 10 |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| 20 | कुसार्या गवत | पान | जुलै ते ऑगष्ट | 90 | 10 |
| 21 | खोबरवेल | पान | जून ते मार्च | 90 | 10 |
| 22 | गराडी | पान | जून ते मार्च | 90 | 10 |
| 23 | चिंच | पान | जून ते मार्च | 90 | 10 |
| 24 | चिकना | पान | ऑगष्ट ते डिसेंबर | 90 | 10 |
| 25 | जंगली तूर | पान | ऑगष्ट ते डिसेंबर | 90 | 10 |
| 26 | जंगली मुंग | पान | ऑगष्ट ते डिसेंबर | 90 | 10 |
| 27 | जवेला | पान | जुलै ते ऑगष्ट | 90 | 10 |
| 28 | जांभूळ | पान | जून ते मार्च | 90 | 10 |
| 29 | झिल्बुली | पान | जून ते मार्च | 90 | 10 |
| 30 | डोर्ली वांगा | पान | जून ते मार्च | 90 | 10 |
| 31 | दुर्वा | पान | जून ते मार्च | 90 | 10 |
| 32 | परसोड | पान | जुलै ते ऑगष्ट | 90 | 10 |
| 33 | पातुर भाजी | पान | जून ते मार्च | 90 | 10 |
| 34 | बोंगा भाजी | पान | जून ते मार्च | 90 | 10 |
| 35 | रांजी | पान | जून ते मार्च | 90 | 10 |
| 36 | रान कुरता | पान | जून ते मार्च | 90 | 10 |
| 37 | हरदफरी | पान | जून ते मार्च | 90 | 10 |
| 38 | हिरडा | पान | जून ते मार्च | 90 | 10 |





गवत

## 3.3 वनस्पती वापर तपशील

### शीट 3 (जाळाऊ लाकूड)

| क्र. | उत्पादन वनउपज | | हंगाम आणि कालावधी | प्रति हंगाम सरासरी गोळा केलेले प्रमाण | |
|---|---|---|---|---|---|
| | वनस्पतीचे नाव | वनस्पतीचा भाग | | समुदायीक क्षेत्रातून | इतर वन क्षेत्रातून |
| 1 | मोह | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |
| 2 | गराडी | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |
| 3 | येन | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |
| 4 | चिंच | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |
| 5 | रोहन | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |
| 6 | झिलबुली | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |
| 7 | सिहाना | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |
| 8 | भेरा | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |
| 9 | बिजा | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |
| 10 | आवळा | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |
| 11 | चारा | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |
| 12 | पळस | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |
| 13 | धावळा | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |
| 14 | कुळा | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |

## 3.4 वनस्पती वापर तपशील

### पत्रक 4 (घर बांधणी)

| क्र. | उत्पादित वनउपज | | हंगाम आणि कालावधी | प्रति हंगाम सरासरी गोळा केलेले प्रमाण | |
|---|---|---|---|---|---|
| | वनस्पतीचे नाव | वनस्पतीचा भाग | | समुदायीक क्षेत्रातून | इतर वन क्षेत्रातून |
| 1 | साग | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |
| 2 | बांबू | ओला बांबू | जानेवारी ते जून | 95 | 5 |
| 3 | येन | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |
| 4 | बिजा | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |
| 5 | गराडी | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |
| 6 | सूर्या | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |
| 7 | मोवई | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |
| 8 | अंजन | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |
| 9 | रोहणी | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |
| 10 | काराखख | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |
| 11 | हळदु | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |

## 3.5 वनस्पती वापर तपशील

### पत्रक 5 (कृषी अवजारे)

| क्र. | उत्पादित वनउपज | | हंगाम आणि कालावधी | सहभागी कुटुंबांची संख्या | प्रति हंगाम सरासरी गोळा केलेले प्रमाण | |
|---|---|---|---|---|---|---|
| | वनस्पतीचे नाव | वनस्पतीचा भाग | | | समुदायीक क्षेत्रातून | इतर वन क्षेत्रातून |
| 1 | साग | नांगर,दांडी | मे ते जून | 10 | 95 | 5 |
| 2 | बोरी | नांगर | मे ते जून | 3 | 95 | 5 |
| 3 | भेरा | नांगर,दांडी | मे ते जून | 25 | 95 | 5 |
| 4 | कोजूब | नांगर | मे ते जून | 36 | 95 | 5 |
| 5 | करारुख | पट्टा,फन,वकर | मे ते जून | 11 | 95 | 5 |
| 6 | अंजन | नांगर, दांडी | मे ते जून | 40 | 95 | 5 |
| 7 | बिजा | नांगर, दांडी | मे ते जून | 5 | 95 | 5 |
| 8 | धावळा | दांडी | मे ते जून | 40 | 95 | 5 |

## 3.6 वनस्पती वापर तपशील

## शीट 6 (कुंपण घालणे)

| क्र. | उत्पादित वनउपज | | हंगाम आणि कालावधी | सहभागी कुटुंबांची संख्या | प्रति हंगाम सरासरी गोळा केलेले प्रमाण | |
|---|---|---|---|---|---|---|
| | वनस्पतीचे नाव | वनस्पतीचा भाग | | | समुदायीक क्षेत्रातून | इतर वन क्षेत्रातून |
| 1 | बांबू | ओला/सुका बांबू | मे ते जून | 97 | 95 | 5 |
| 2 | साग | वाळलेला लाकूड | मे ते जून | 50 | 95 | 5 |
| 3 | गराडी | वाळलेला लाकूड | मे ते जून | 55 | 95 | 5 |
| 4 | येन | वाळलेला लाकूड | मे ते जून | 45 | 95 | 5 |
| 5 | बिजा | वाळलेला लाकूड | मे ते जून | 44 | 95 | 5 |
| 6 | पळस | वाळलेला लाकूड | मे ते जून | 67 | 95 | 5 |
| 7 | रोहणी | वाळलेला लाकूड | मे ते जून | 70 | 95 | 5 |
| 8 | धावळा | वाळलेला लाकूड | मे ते जून | 30 | 95 | 5 |

## 3.7 वनस्पती वापर तपशील

### पत्रक 7 (संस्कृती)

| क्र. | उत्पादित वनउपज | | हंगाम आणि कालावधी | कारण |
|---|---|---|---|---|
| | वनस्पतीचे नाव | वनस्पतीचा भाग | | |
| 1 | मोह | फांदी,पान | मार्च ते मे | लग्नासाठी |
| 2 | बांबू | बांबू | मार्च ते मे | लग्नासाठी |
| 3 | साग | वाळलेला लाकूड | मार्च ते मे | लग्नासाठी |
| 4 | जांभूळ | फांदी | मार्च ते मे | लग्नासाठी |
| 5 | कोजूब | फांदी | मार्च ते मे | लग्नासाठी |
| 6 | वराकली | फळ | मार्च ते मे | पूजेसाठी |
| 7 | कुळा | पान,शेंग | ऑगष्ट | पोळा सणाच्या वेळी |
| 8 | शिंदी | पान | मार्च ते मे | मोहूर/बाशिंग बनविण्यासाठी |
| 9 | माहूर | पान | मार्च ते मे | पत्राली |
| 10 | मोहई | वाळलेला लाकूड | मार्च ते मे | लग्नासाठी |
| 11 | येन | वाळलेला लाकूड | मार्च ते मे | लग्नासाठी |
| 12 | शतावरी | पान | ऑगष्ट | पोळा सणाच्या वेळी |
| 13 | बेल | पान | हमेशा | पूजेसाठी |
| 14 | बोर | फळ | जानेवारी | वान वाटणी |
| 15 | भेरा | पान | ऑगष्ट | पोळ्यासाठी |
| 16 | तुळशी | पान | मार्च ते मे | लग्नासाठी |
| 17 | दुर्वा | पान | बाराही महिने | पूजेसाठी |
| 18 | पळस | पान | मार्च ते मे | पत्रावळी |
| 19 | परसोड | फळ | ऑक्टोंबर ते नोव्हेंबर | दिवाळी साठी |
| 20 | कडूनिंब | पान | मार्च | पूजेसाठी |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| 21 | चिंच | फळ | बाराही महिने | आंबट टाकण्यासाठी |
| 22 | आंबा | पान,फळ | मार्च | नवा साठी व पूजेसाठी |
| 23 | करकरी | फुल | ऑगष्ट | पोळ्यासाठी |
| 24 | आवळा | फळ | जानेवारी | नवा पोलोच्या वेळी |
| 25 | उमरून | पान,फळ | बाराही महिने | पूजेसाठी |

## 3.8 वनस्पती वापर तपशील

### पत्रक 8 (वन औषधी)

| क्र. | उत्पादित वनउपज | | हंगाम आणि कालावधी | प्रति हंगाम सरासरी गोळा केलेले प्रमाण | |
|---|---|---|---|---|---|
| | वनस्पतीचे नाव | वनस्पतीचा भाग | | समुदायीक क्षेत्रातून | इतर वन क्षेत्रातून |
| 1 | कोवे जीरा | पंचांग | मार्च ते एप्रिल | 95 | 5 |
| 2 | निराल वराल | पंचांग | नोव्हेंबर ते डिसेम्बर | 95 | 5 |
| 3 | शेरडीरा | पंचांग | जून | 95 | 5 |
| 4 | उरपालवंजर | पंचांग | जुलै | 95 | 5 |
| 5 | पोडोर | पंचांग | नोव्हेंबर ते डिसेम्बर | 90 | 10 |
| 6 | हुप्पे तोकार | पंचांग | जानेवारी ते फेब्रुवारी | 95 | 5 |
| 7 | पदमाटी | कांदा | नोव्हेंबर ते डिसेम्बर | 95 | 5 |
| 8 | सुपारमाटी | कांदा | जून ते ऑगष्ट | 95 | 5 |
| 9 | केहकामाटी | कांदा | नोव्हेंबर ते डिसेम्बर | 95 | 5 |
| 10 | हादेमाटी | पंचांग | नोव्हेंबर ते डिसेम्बर | 95 | 5 |
| 11 | नांगेलमाटी | पंचांग | नोव्हेंबर ते डिसेम्बर | 95 | 5 |
| 12 | कांदाळ उल्ली | पंचांग | जून ते जुलै | 95 | 5 |
| 13 | कर्वूलमाटी | कांदा | जून ते जुलै | 95 | 5 |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| 14 | हिर माटी | पंचांग | नोव्हेंबर ते डिसेम्बर | 95 | 5 |
| 15 | नसतोंडा | पंचांग | जून ते मार्च | 95 | 5 |
| 16 | अदरवेल | पंचांग | बाराही महिने | 95 | 5 |
| 17 | पार्सेला | पंचांग | ऑगष्ट | 95 | 5 |
| 18 | कटूल कोसा | पंचांग | जून ते मार्च | 95 | 5 |
| 19 | दुधूम | पंचांग | बाराही महिने | 95 | 5 |
| 20 | नयनेंडी | पंचांग | जून ते ऑगष्ट | 95 | 5 |
| 21 | मस्या | साल | जून ते ऑगष्ट | 95 | 5 |
| 22 | डोकेमरा | साल | जून ते ऑगष्ट | 95 | 5 |
| 23 | हिवीर | मूळ | बाराही महिने | 95 | 5 |
| 24 | मूसतुमीर | फळ | डिसेम्बर | 95 | 5 |
| 25 | तिरका | फळ | डिसेंबर ते मार्च | 95 | 5 |
| 26 | सिरेल | साल | जून ते ऑगष्ट | 95 | 5 |
| 27 | चंद्रीमरा | साल,मूळ | जून ते ऑगष्ट | 95 | 5 |
| 28 | नाचुम | साल | बाराही महिने | 95 | 5 |
| 29 | कोरकोट जपी | पान,मूळ | बाराही महिने | 95 | 5 |
| 30 | बोराभाजी | पंचांग | जून ते नोव्हेंबर | 95 | 5 |
| 31 | अडूळसा | पंचांग | जून ते नोव्हेंबर | 5 | 95 |
| 32 | झरका | पंचांग | जून ते जुलै | 95 | 5 |
| 33 | आघाडा | पंचांग | जून ते जानेवारी | 95 | 5 |
| 34 | अंजन | पंचांग | बाराही महिने | 95 | 5 |
| 35 | आटइ | साल | बाराही महिने | 95 | 5 |
| 36 | आपटा | साल | बाराही महिने | 95 | 5 |
| 37 | आंबा | पान,साल | बाराही महिने | 5 | 95 |
| 38 | उतरणवेल | पंचांग | बाराही महिने | 95 | 5 |
| 39 | उमरून | पंचांग | बाराही महिने | 50 | 50 |

